वाहतुक खाते परिपत्रक क्र. सुधारित २/२००१

राप/वाह/ सवलत/अंध अपंग/ ५५८,
म.रा.मा.प महामंडळ, मध्यवर्ती कार्यालय
महाराष्ट्र वाहतुक भवन
डॉ. आनंदराव नायर मार्ग मुंबई ४
दिनांक २५ जानेवारी २००१.

उप महाव्यवस्थापक
रा.प. महामंडळ
मुंबई / पुण/ नाशिक/ नागपूर/ औरंगाबाद/ अमरावती.

विभाग नियंत्रक
मुंबई / जळगांव / नाशिक / पालघर/ धुळे / रायगड-पेण/ रत्नागिरी/ सिंधुदुर्ग/ ठाणे/ पुणे/ अहमदनगर / कोल्हापूर / सांगली/ सातारा/ सोलापूर / औरंगाबाद / बीड / जालना / लातूर / नांदेड / उस्मानाबाद / परभणी / नागपूर / अकोला / अमरावती / भंडारा / बुलढाणा / चंद्रपूर / वर्धा / यवतमाळ / भांडार विभाग कुर्ला.

विषय : अंध व अपंग व्यक्ती / विद्यार्थी – विद्यार्थीनी यांना रा.प. प्रवास भाड्यात विना अट सवलत देण्याबाबत

संदर्भ : या कार्यालयाचे परिपत्रक क्रमांक २०/२००० पत्र क्र. राप/ वाह/ अपंग सवलत/ ७१३२ दिनांक १८.१०.२०००.

उपरोक्त परिपत्रकान्वये अंध व अपंग व्यक्ती / विद्यार्थी - विद्यार्थीनी यांना रा. प. बस प्रवास भाड्यात सवलत देण्याबाबत सविस्तर सुचना देण्यात आलेल्या होत्या. तरी देखील अंध व अपंग व्यक्ती / विद्यार्थी विद्यार्थीनी यांना वाहक रा.प. बस प्रवास भाड्यात सवलत नाकारतात. अशा तक्रारी मोठ्या प्रमाणात शासकिय, शासनमान्य अंध व अपंगांच्या शिक्षण संस्था, कल्याण व पुनर्वसन कार्यात समर्पित असलेल्या संस्थांकडून येत आहेत. त्यामुळे आपणांस पुन्हा एकदा खालील सुधारित सुचना अंमलबजावणीसाठी देण्यात येत आहेत.

१. महामंडळ ठराव क्र. २०००-०९ दिनांक १४.९.२००० अन्वये अंध व अपंग व्यक्ती / विद्यार्थी विद्यार्थीनी यांना रा.प. सर्वसाधारण बसमध्ये विनाअट भिक्षा मागणे वगळून प्रवास भाड्यात ७५ टक्के तसेच अंधत्व / अपंगत्वामुळे पुर्णत: परावलंबी व्यक्तीबरोबर प्रवास करणा-या मदतनीस व्यक्ती / विद्यार्थी विद्यार्थीनी यांना ५० टक्के प्रवास भाड्यात सवलत देण्यात यावी असा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार अंध व अपंगांना ही सवलत मिळण्याकरिता वाहकांना त्यांनी शासकिय, शासनमान्य अंध व अपंगांच्या शिक्षण संस्था, कल्याण व पुनर्वसन कार्यात समर्पित असलेल्या संस्थांकडून मिळविलेले ओळखपत्र ज्यावर आगार व्यवस्थापक यांनी सहीशिक्का दिलेला आहे असे ओळखपत्र दाखवावे लागेल. अशा अंध व अपंगांच्या शासन मान्य संस्थांची यादी जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांचेकडून विभाग नियंत्रक यांनी प्राप्त करावी तसेच शासकिय म्हणजे जिल्हा समाज कल्याण खात्यातील अधिका-यांनी दिलेले ओळखपत्र आणि यादी मधील संस्थांनी दिलेले ओळखपत्र ज्यावर अपंगत्वाचा प्रकार व टक्केवारी यांचा उल्लेख केलेला असतो असे ओळखपत्र ग्राह्य धरण्यात यावे.

२. सदर सवलत अपंग व्यक्तींचा कायदा- समान संधी हक्क, संरक्षण पुर्ण सहभाग १९९५ अन्वये खाली नमुद केलेल्या अंध व अपंग व्यक्ती / विद्यार्थी- विद्यार्थीनी यांना देण्यात यावी. अपंगत्व म्हणजे खालीलप्रमाणे -

१. अंधत्व पुर्ण
२. कमी दृष्टी
३. कुष्ट रोग मुक्त
४. कर्णबधिर
५. अवयवातील कमतरता
६. मतिमंदत्व
७. मनोविकृती.

**कर्णबधिर** - ऐकण्याच्या दृष्टीने चांगल्या असणा-या कानात संभाषणाच्या संबंधित तरंगपट्टीत ६० डेसिबल किंवा त्यापेक्षा अधिक असेल तर त्याला कर्णदोष म्हणावे.

**विकलांगता - लोकोमोटोर डिसॅबिलिटी** - म्हणजे हाडे, सांधे, स्नायु यातील दोषामुळे अवयवातील हात पाय हालचालीवर येणा-या मर्यादा किंवा पक्षाघाताचे सर्व प्रकार.

**वैद्यकिय अधिकारी** - या कायद्याचे योग्य त्या शासनाने मान्यता दिलेले कोणतेही हॉस्पिटल किंवा संस्था.

**मनोविकृती - मेंटल इलनेस** - म्हणजे मतिमंदत्वाव्यतिरिक्त मेंदुतील कोणतीही विकृती.

**मतिमंदत्व - मेंटल रिटारडेशन** म्हणजे ज्याच्या मनाची वाढ थांबल्याने किंवा अपुर्ण झाल्याने त्याच्या बुध्दीत विसंगती झाली आहे अशी व्यक्ती.

**जाहिरनामा - नोटीफिकेशन** - म्हणजे शासनाने राजपत्राद्वारे प्रसिध्द केलेली माहिती.

**अपंग व्यक्ती - पर्सन्स वुईथ डिसॅबिलिटी** म्हणजे ज्यांच्यात शारिरीक कमतरता ४० टक्क्यापेक्षा कमी नाही असे वैद्यकिय अधिका-याने निर्देशित केले आहे अशी व्यक्ती.

**कमी दृष्टीची व्यक्ती - पर्सन वुईथ लो व्हीजन** - ज्या व्यक्तीचा दृष्टीदोष शस्त्रक्रियेमुळे किंवा चष्मा / कॉन्टॅक्टर लेन्स या सारख्या उपकरणाच्या सहाय्यामुळे कमी झाला आहे व जी व्यक्ती दैनंदिन व्यवहार करु शकते अशा व्यक्तीला कमी दृष्टीची व्यक्ती म्हणावे.

वरील अनु. क्र. 3 मध्ये दर्शविलेले अपंगत्व कुष्टरोगी मुक्त - लेप्रसी क्युअर्ड याबाबत अधिक खुलासा करण्यात येत आहे की या कार्यालयाचे परिपत्रक क्र. ११/१९८० पत्र क्रमांक राप / वाह/ सीएमएस/ २०८/ 3 ७७/२९२८ दिनांक २१.४.१९८० अन्वये दिलेल्या सुचनांमध्ये कुष्टरोग्यांना विहीत केलेल्या वैद्यकिय संस्थांमध्ये औषधोपचारास जाणे येणेसाठी राज्य परिवहन प्रवास भाड्यात ७५ टक्के सवलत देण्यात आली होती तथापि अंध व अपंगांप्रमाणेच कुष्टरोग्यांना कोणत्याही कारणासाठी राज्य परिवहन बसने प्रवास करतांना ओळखपत्राच्या आधारे ७५ टक्के प्रवास भाडे सवलत देण्यात यावी. तसेच परावलंबी कुष्टरोग्यांबाबत प्रवासातील साथीदारास ५० टक्के प्रवास भाडे अनुज्ञेय राहील.

३.	पुर्ण अंध / शारिरीक / मानसिक अपंगत्वामुळे पुर्णत: परावलंबी असलेल्या व्यक्ती / विद्यार्थी - विद्यार्थीनी यांचे सोबत असलेल्या मदतनीसास राज्य परिवहन प्रवास भाड्यात ५० टक्के सवलत देण्यात यावी अशा साथीदाराला स्वतंत्र दाखला ओळखपत्र तसेच राज्य परिवहन अधिका-याची सही शिक्क्याची आवश्यकता नाही.

४.	वाहकांनी अंध व अपंग व्यक्ती विद्यार्थी - विद्यार्थीनी यांनी अधिकृत ओळखपत्र व त्यावर राज्य परिवहन आगार व्यवस्थापकांची सही व शिक्का पाहून राज्य परिवहन प्रवास भाड्यात ७५ टक्के सवलत देवून २५ टक्के भाडे आकारून तेवढ्या मुल्याची तिकीटे पंच करून द्यावीत व त्याची नोंद मार्ग पत्रकावर अंध व अपंग व्यक्ती विद्यार्थी - विद्यार्थीनी सवलत म्हणून स्वतंत्रपणे करावी तसेच जर अंध व अपंग व्यक्ती विद्यार्थी - विद्यार्थीनी एकट्याने प्रवास करु शकत नसतील तर त्याचे सोबतच्या साथीदारास राज्य परिवहन प्रवास भाड्यात ५० टक्के सवलत देण्यात यावी व ५० टक्के भाडे आकारणी करून तिकीटे पंच करून द्यावीत व मार्गपत्रकावर नोंद करावी.

५.	जर अंध व अपंग व्यक्ती विद्यार्थी - विद्यार्थीनी यांना प्राप्त झालेल्या ओळखपत्राचे पाच वर्षानंतर नुतनीकरण करून घेणे आवश्यक राहील. ओळखपत्राची मुदत संपल्यानंतर नुतनीकरण न केलेले ओळखपत्र सवलतीस ग्राह्य धरले जाणार नाही. ओळखपत्र हरविले / खराब झाले तर नवीन ओळखपत्रावर आगार व्यवस्थापकांनी सही शिक्का द्यावा.

६.	अशा अंध व्यक्ती आणि अपंग व्यक्ती विद्यार्थी - विद्यार्थीनी यांना आरक्षणाचा पुर्ण आकार व सवलतीचे पुर्ण भाडे आकार घेऊन आरक्षण करता येईल.

७.	आगार व्यवस्थापक यांनी अंध आणि अपंग व्यक्ती विद्यार्थी - विद्यार्थीनी यांचे ओळखपत्रावर सही शिक्का देण्यापुर्वी नोंदवहीत विहीत नमुन्यात नोंदवून ओळखपत्र मिळाल्याची संबंधितांची सही घ्यावी. आगार पातळीवर या विषयाबाबत ठेवावयाच्या नोंदवहीचा विहीत नमुना परिशिष्ट ई मध्ये जोडला आहे. विभाग नियंत्रक यांनी त्यांचे विभागात कार्यरत असलेल्या शासकिय शासनमान्य संस्थांना सदर सवलतीची तपशिलवार माहिती कळविली आहे. अंध व अपंग व्यक्ती / विद्यार्थी - विद्यार्थीनी यांनी ओळखपत्रावर राज्यपरिवहन मंडळाच्या आगारव्यवस्थापकाची सही / शिक्का देण्यासाठी त्यांचे कचेरीशी संपर्क साधण्याबाबत कळविण्यात यावे.

८.	रा. प. कर्मचा-याच्या व प्रवाशांच्या माहितीसाठी या सवलतीची माहिती असलेले फलक आगार व नियंत्रक कक्ष इ. ठिकाणी लावावेत.

९.	कार्यालयाचे परिपत्रक क्रमांक २०/२००० पत्र क्रम रापं/ वाह/ अपंग सवलत / ७१३२/ दिनांक १८.१०.२००० अन्वये दिलेल्या सुचना सोबत जोडलेल्या विहीत नमुन्यातील परिशिष्ट अ मध्ये वाहकाने मार्गसंक्षेपाच्या मागील बाजुस या लाभार्थी घटकास दिलेल्या सवलतीची अचुक नोंद करावी. व आगार लेखाकार यांनी त्याचे अंकेक्षण करावे. परिशिष्ट अ मध्ये नोंदवहीत तिकीट व रोकड शाखेत आगार पातळीवर अचुक आगार पातळीवर अचुक नोंद ठेवून आगार लेखाकार यांनी अंकेक्षण करावे. परिशिष्ट क मध्ये व परिशिष्ट ड मध्ये विवरणाद्वारे अनुक्रमे दरमहा दरमहा ९ तारखेस आणि १७ तारखेस आगार प्रमुखाने विभागीय कार्यालयास व विभाग नियंत्रकांनी मध्यवर्ती कार्यालयास पाठवावे.

१०.महाराष्ट्र शासन निर्णय क्रमांक एसटीसी ३४००/६३१/ सीआय ३१/परि १ दिनांक २०.६.२००० नुसार राज्य परिवहन महामंडळाने विविध सामाजिक घटकांना प्रदान केलेल्या प्रवास भाडे सवलत

मुल्याची - त्यांची १०० टक्के प्रतिपुर्ती राज्य परिवहन महामंडळास करुन या सवलतीचे रक्कम प्रवासी करातून समायोजन करण्यात येणार असल्याने यापुढे अंध व अपंगांना विना अट सवलत प्रदान करतांना सहकार्य करावे.

ह्या सर्व वरील सुचना वाहतुक / वाहतुक नियंत्रक पर्यवेक्षक कर्मचारी यांना समजावून सांगण्यात याव्यात. त्यांची नोंद नोंदवहीत करुन त्यांची सही घ्यावी. तसेच अंध / अपंग व्यक्ती / विद्यार्थी / विद्यार्थीनी यांना प्रवासात चढण्या / उतरण्याकरीता सहकार्य व प्राधान्य द्यावे. तसेच शक्य असल्यास बसमध्ये बसण्याकरीता आसन उपलब्ध करुन द्यावे. या सवलतीची अंमलबजावणी परिपत्रक २०/२००० प्रदर्शित झाल्यापासून म्हणजे दिनांक १८.१०.२००० पासुन करावी.

हे परिपत्रक वरिष्ठ महाव्यवस्थापक आणि वित्तीय सल्लागार तसेच वरिष्ठ महाव्यवस्थापक आणि मुख्य लेखा अधिकारी यांच्या सहमतीने जारी करण्यात येत आहे.

कृपया सदर परिपत्रकाची पोहोच द्यावी.

सही /-

महाव्यवस्थापक- वाहतुक